सन २०२४-२५ मधील प्राप्त तरतूदीचे वितरण करणेबाबत.
राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४).

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण.०५२४/प्र.क्र.४४/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७ /२-स, दि १७.०५.२००६.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर ०३१३/प्र. क्र. १४४/२-स, दि ०५.०९.२०१४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. पूरक-२०२४/प्र.क्र.७९ /अर्थ-३,दि.२९.०७.२०२४.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकीर्ण.०४२४/प्र. क्र. ३९/२-स, दि ०४.०९.२०२४.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र.कृषीपत-०२/२.५% व्याज सवलत योजना /निधी मागणी/२०२४/३०२९. दि.११.११.२०२४

**प्रस्तावना** -:

राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य (२४२५ २५२४) या योजनेअंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना २.५ टक्के दराने व्याज परतावा देण्यात येतो. सदर योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये रु. ३६०.३८ कोटी इतका निधी मूळ अर्थसंकल्पीय तरतूदीव्दारा व रु. १७४.२३ कोटी पुरवणी मागणीव्दारा मंजूर आहे. अशा प्रकारे, या योजनेसाठी रु. ५३४.६१ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात या योजनेसाठी रु. २००.०० कोटी इतका निधी संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक ०४.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहकार आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे. आता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये सदर योजनेसाठी रु. ३३४.६१ कोटी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार निधी वितरणाच्या प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधुन अवितरीत असलेल्या निधीपैकी रु. १६०.०० कोटी (रु. एकशे साठ कोटी फक्त) एवढा निधी राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (राज्यस्तर) (कार्यक्रम), (२४२५ २५२४) ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन वेळेत खर्च होईल याची दक्षता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, २४२५-सहकार (००) (१०७) सहकारी पतसंस्थांना सहाय्य (०१)(१६) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४०४/१४३१, दिनांक ०७.०८.२०२४ अन्वये व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६९ /२०२५/व्यय-२, दिनांक ०३.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०२२८११४७४३६६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.02.28 11:48:53 +05'30'

**(संतोष पाटील)**
**अपर निबंधक तथा सहसचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
५) निवासी व लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन २-स).